**राज्यामधील मृतांच्या हक्काचे संरक्षण करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकरिता स्टँडर्ड ऑपरेटिंग प्रोसिजर (SOP) तयार करण्यासाठी अभ्यास समिती गठीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग,**

**शासन निर्णय क्र. न्यायाप्र-२०२४/प्र.क्र.१७८/नवि-२०**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
४ था मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ जून, २०२४

**प्रस्तावना :**

मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग यांनी मराठी वृत्तपत्र दैनिक सामनामध्ये दि.२३.०२.२०२४ रोजी "वरळीतील माता रमाई आंबेडकर स्मशानभूमीतील दफनभूमीची दुरावस्था" या मथळयाखाली प्रसिध्द झालेल्या वृत्ताच्या अनुषंगाने सुमोटो याचिका क्र.११३१/१३/१६/२०२४ दाखल केली आहे. सदर प्रकरणी दि.२६.०२.२०२४ व दि.१४.०३.२०२४ रोजी मा.मानवी हक्क आयोग येथे संपन्न झालेल्या सुनावणीमध्ये खालीलप्रमाणे निर्देश दिले आहेत.

> “As per the advisory issued by National Human Rights Commission, New Delhi whether State of Maharashtra framed any SOP and if it is framed then place on record. If it is not framed, what steps taken by them for framing SOPS”

२. मुंबई महानगरपालिका अधिनियम १९८८, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मधील तरतूदीनुसार “प्रेतांची विल्हेवाट लावणे” यासंदर्भात तरतूदी आहेत तसेच मृत्युनंतर प्रेतांची विल्हेवाट लावणे यासंदर्भात विविध विभागांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने Advisory दिली आहे. त्यामध्ये विविध विभागांनी करावयाच्या कार्यवाहीचा समावेश आहे. त्यामध्ये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी खालीलप्रमाणे कार्यवाहीबाबत नमूद केले आहे.

i. Ensuring appropriate disposal of the dead body : In the event of legal heirs disowning the body and depriving it of a decent burial, the local Government/civic body should ensure proper disposal of the body after due legal procedures like post-mortem etc.

ii. Donation of organs by the deceased : The law should be amended to the effect that the will of the deceased regarding the organ donation is given prime importance irrespective of the opinion of the legal heir.

iii. Maintenance of burial grounds / crematoriums : It must be ensured by the State/ Local Government that the condition of crematoriums, burial grounds, electric crematoriums are properly maintained to keep them in effective working conditions.

iv. Encouraging electric cremation methods : Environment friendly cremation practices like the usage of electric crematoriums may be encouraged, which would also reduce the burden on the existing burial grounds/ crematoriums.

v. Periodic inspections : The local government bodies should visit the local hospitals to ensure the compliance of the guidelines in management of the claimed or unclaimed dead bodies.

vi. Transportation of the dead bodies : The local authorities should ensure that the transportation facilities are available to transport the body of the deceased at the request of family members.

vii. In case of unidentified dead bodies : The last rites of unidentified dead bodies should be performed with honour and dignity while taking their religion into consideration. The necessary fund required for this purpose may be adequately maintained.

viii. Maintenance of database : Local government/ District Registrar of deaths should maintain the database of deaths in the district.

उपरोक्त बाबींच्या अनुषंगाने "राज्यामधील मृतांच्या हक्काचे संरक्षण करण्यासाठी" मुंबई महानगरपालिका अधिनियम १९८८, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मधील तरतूदी व मा.राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने निर्गमित केलेल्या Advisory नुसार सदर Advisory मधील बाबींची पूर्तता होत नसल्यास त्यानुषंगाने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करावयाची कार्यवाही याबाबत नवीन SOP तयार करण्याची राज्य शासनास आवश्यकता आहे किंवा कसे याबाबींचा अभ्यास करण्याकरिता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुंबई महानगरपालिका अधिनियम १९८८, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मधील तरतूदीनुसार "प्रेतांची विल्हेवाट लावणे" या तरतूदीनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून त्यांच्या क्षेत्राकरिता कार्यवाही करण्यात येते. परंतु सदर तरतूदीच्या अनुषंगाने मा.राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने निर्गमित केलेल्या Advisory नुसार सदर Advisory मधील बाबींची पूर्तता होत नसल्यास त्यानुषंगाने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करावयाची कार्यवाही याबाबत नवीन SOP तयार करण्याची राज्य शासनास आवश्यकता आहे किंवा कसे याबाबींचा अभ्यास करुन शासनास समितीचे अभिप्राय कळविण्याबाबत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्या अध्यक्षतेखाली याद्वारे समिती स्थापन करण्यात येत असून त्या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

२. **समितीची रचना :**

| **अ.क्र.** | **संबंधित अधिकारी** | **समिती मधील पदनाम** |
|---|---|---|
| १. | आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर भवन, नवी मुंबई | अध्यक्ष |
| २. | उप सचिव (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | आयुक्त, महानगरपालिका (DMA मार्फत निर्देशित) | सदस्य |
| ४. | मुख्याधिकारी, नगरपरिषद (DMA मार्फत निर्देशित) | सदस्य |
| ५. | मुख्याधिकारी, नगरपंचायत (DMA मार्फत निर्देशित) | सदस्य |
| ६. | वैद्यकीय अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| ७. | उपायुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| ८. | उपायुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई | सदस्य-सचिव |

सदर समितीद्वारे उपरोक्त नमुद बाबींसंदर्भात सदर समितीच्या बैठकीस समाजातील सर्व संबंधीत घटक, सामाजिक संस्था, अधिकारी तसेच इतर संबंधीत यांना किंवा त्यांच्या प्रतिनिधींना आवश्यकतेनुसार सदर बैठकीस आमंत्रित सदस्य म्हणून निमंत्रित करण्याचा अधिकार सदर समितीच्या अध्यक्षांना राहील.

उक्त विषयाच्या अनुषंगाने सदर समितीने आपला अहवाल दोन महिन्यात शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१९१८००१९८५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANILKUMAR
RAMDASPANT UGLE

Digitally signed by ANILKUMAR RAMDASPANT UGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c366de3a32ea2a050a8a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8BBD8635D43D23F28021156F38051619258C51238668F40D15D3209EA39554AA, cn=ANILKUMAR RAMDASPANT UGLE
Date: 2024.06.19 18:16:22 +05'30'

**(अनिलकुमार रा. उगले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर भवन, नवी मुंबई.
७) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
८) मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपंचायती (सर्व)
९) निवडनस्ती, कार्यासन नवि-२०.